**श्री. यतीन साखळकर, कार्यकारी अभियंता (स्थापत्य) यांचे मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, मुंबई यांच्या आस्थापनेवरील सेवेमध्ये कायमस्वरुपी समावेशन ...**

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक बांधकाम विभाग

**शासन आदेश क्रमांकः टीएफएस-१११७/प्र.क्र. १३० (१) /सेवा-१**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
तारीख: २७ जुलै, २०१८

**पहा**: १) वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक : पीईएन-१०८०/सीआर २१०/सेवा-४, दिनांक २८.४.१९८१,
२) वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक : सेनिवे-१०९०/ १४६/ सेवा-२, दिनांक ३१.५.१९९४,
३) मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, मुंबई यांचे पत्र क्रमांक प्र/ आस्था-१५ (प्रतिनियुक्त-समावेशन)/ १६१४/२०१७, दिनांक २०.४.२०१७.

**शासन आदेश :-**

श्री. यतीन ए. साखळकर, कार्यकारी अभियंता (स्थापत्य) हे दिनांक २१.६.२०११ पासून मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, मुंबई यांच्या आस्थापनेवर शासनाच्या मान्यतेने प्रतिनियुक्तीने कार्यरत आहेत. मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, मुंबई हे महाराष्ट्र शासनाचे अंगीकृत प्राधिकरण आहे. मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, मुंबई यांच्याकडे सुरु असलेल्या व दीर्घकाळ चालणाऱ्या अत्यंत महत्त्वाच्या प्रकल्पांच्या पूर्णत्वाकरिता श्री. यतिन साखळकर यांच्या सेवेची निकड असल्याचे मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाने संदर्भाधीन दिनांक २०.४.२०१७ च्या पत्रान्वये कळविले आहे. तसेच श्री. साखळकर यांनी प्राधिकरणामध्ये कायमस्वरुपी समावेशन करण्याकरिता दिनांक १३.६.२०१७ च्या अर्जान्वये शासनाकडे विनंती केलेली आहे.

२. उपरोक्त अनुषंगाने श्री. यतिन साखळकर, कार्यकारी अभियंता (स्था) यांच्या मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाकडील कायमस्वरुपी समावेशनाबाबत शासन खालीलप्रमाणे आदेश देत आहे.

"वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक: पीईएन-१०८०/सीआर २१०/सेवा-४, दिनांक २८.४.१९८१ मधील परिच्छेद ९ अनुसार व महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा.....) नियम, १९८१ मधील प्रतिनियुक्तीच्या अटी व शर्तीबाबत नियम ४०, परिशिष्ट-दोन मधील अट क्रमांक १९ ला अनुसरुन, श्री. यतिन साखळकर, कार्यकारी अभियंता यांना दिनांक ३१.७.२०१८ (म.नं.) पासून शासन सेवेतून निवृत्त झाले असे मानण्यास व त्या दिनांकापासून त्यांचे मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, मुंबई यांच्या आस्थापनेवर लोकहितार्थ स्थायी स्वरुपात समावेशन करण्यास शासन अनुमती देत आहे."

३.    वित्त विभाग शासन निर्णय दिनांक २८.४.१९८१ व शासन निर्णय दिनांक ३१.५.१९९४ मधील तरतूदी व महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम, १९८२ मधील नियम ६७ अनुसार अनुज्ञेय असलेले सेवानिवृत्तीविषयक फायदे मिळण्यास श्री. साखळकर पात्र राहतील. श्री. साखळकर यांनी महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम, १९८२ मधील नियम ६७ (ई) मधील तरतुदीनुसार आवश्यक विकल्प, समावेशन झाल्याच्या दिनांकापासून ६ महिन्याच्या आत देणे आवश्यक राहील. स्थायी समावेशनाच्या दिनांकाला त्यांच्या खाती शिल्लक असलेली रजा त्यांच्या रजाखाती यापुढेही शिल्लक दाखविण्यात यावी. त्याच्या मोबदल्यात शासन प्राधिकरणास श्री. साखळकर यांच्या खाती दिनांक ३१.७.२०१८ (म.नं.) पर्यंत शिल्लक असलेल्या अर्जित रजेचे रजावेतन ठोक रकमी अदा करील.

४.    श्री. साखळकर हे प्राधिकरणाकडील सेवेत रुजू झाल्याच्या दिनांकापासून, त्यांचा शासनाकडील अभियंता संवर्गातील कोणत्याही पदावर धारणाधिकार शिल्लक राहणार नाही.

५.    प्रस्तुत शासन निर्णय, वित्त विभागाच्या शासन निर्णय क्रमांक: सेनिवे-१००१/ १३०/ सेवा-४, दिनांक २.६.२००३ सोबतच्या परिशिष्ट-एक मधील महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम, १९८२ च्या अनुषंगाने अ.क्र. १३ मधील नमूद तरतुदीनुसार विभागाला प्रदान करण्यात आलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०७२७१४३८४३०२१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Mridula Sanjeev Deshpande

Digitally signed by Mridula Sanjeev Deshpande
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b989f11a955bd12836202040b21122502b1ac600cf24865b3b7d7169e14596c4, cn=Mridula Sanjeev Deshpande
Date: 2018.07.27 14:39:21 +05'30'

**(मृ. सं. देशपांडे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,
२. महानगर आयुक्त, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, मुंबई,
३. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई/कोकण/पुणे/ नाशिक/ औरंगाबाद/ अमरावती/ नागपुर/ राष्ट्रीय महामार्ग, नवी मुंबई,
४. मुख्य अभियंता (विद्युत), मुंबई,
५. मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
६. संचालक, उपवने व उद्याने, मुंबई,
७. संचालक, माहिती तंत्रज्ञान समन्वय केंद्र, हॉटेल सागर प्लाझा समोर, कॅंप पुणे,

८. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षा ) महाराष्ट्र राज्य-१, मुंबई,
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
१०. श्री. यतीन ए. साखळकर, कार्यकारी अभियंता, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, मुंबई
११. मा. मंत्री, सा.बां. (सार्वजनिक उपक्रम वगळून) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
१२. मा. मंत्री, सा. बां. (सार्वजनिक उपक्रम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय मुंबई,
१३. मा. राज्यमंत्री, सा. बां. (सार्वजनिक उपक्रम वगळून) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
१४. मा. राज्यमंत्री, सा. बां. (सार्वजनिक उपक्रम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय मुंबई,
१५. प्रधान सचिव (सा.बां.), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई, यांचे स्वीय सहायक,
१६. सचिव ( रस्ते / बांधकामे), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई, यांचे स्वीय सहायक,
१७. सर्व सह सचिव / उपसचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
१८. सार्वजनिक बांधकाम विभाग / आस्था-१, आस्था-३, सेवा-६, संगणक कक्ष, मंत्रालय, मुंबई,
१९. निवडनस्ती.